३.२ महिला, खेळाडू व अनाथांसाठी असलेले समांतर आरक्षण हे कप्पीकृत (Compartmentalised) आहे.

३.३ महिला, खेळाडू तसेच अनाथांसाठीचे आरक्षण हे शासनाने यासंदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशानुसार राहील.

३.४ समांतर आरक्षणाबाबत शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआरव्ही-१०१२/प्र.क्र.१६/१२/१६-अ, दिनांक १३ ऑगस्ट, २०१४ तसेच शासन शुध्दीपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक संकीर्ण-१११८/प्र.क्र.३९/१६-अ, दिनांक १९ डिसेंबर, २०१८ आणि तदनंतर शासनाने यासंदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशानुसार कार्यवाही करण्यात येईल.

३.५ महिलांसाठी आरक्षित पदांकरिता दावा करणा-या उमेदवारांनी महिला आरक्षणाचा लाभ घ्यावयाचा असल्यास त्यांनी अर्जामध्ये न चुकता महाराष्ट्राचे अधिवासी (Domiciled) असल्याबाबत तसेच नॉन क्रीमीलेअर मध्ये मोडत असल्याबाबत (अनुसूचित जाती व अनुसूचित जमाती वगळून) स्पष्टपणे दावा करणे आवश्यक आहे.

३.६ विमुक्त जाती (अ), भटक्या जमाती. (ब), भटक्या जमाती (क) व भटक्या जमाती (ड) प्रवर्गासाठी आरक्षित असलेली पदे आंतरपरिवर्तनीय असून आरक्षित पदासाठी संबंधित प्रवर्गातील योग्य व पात्र उमेदवार उपलब्ध न झाल्यास अद्ययावत शासन धोरणाप्रमाणे उपलब्ध प्रवर्गाच्या उमेदवाराचा विचार गुणवत्तेच्या आधारावर करण्यात येईल.

३.७ सामाजिक व शैक्षणिकदृष्ट्या मागासवर्गातील (एसईबीसी) उमेदवारांकरीता शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांक:सीबीसी-१०/२०१८/प्र.क्र.१३०/मावक, दिनांक ७ डिसेंबर, २०१८ अन्वये विहित करण्यात आलेले जातीचे प्रमाणपत्र, कागदपत्र पडताळणीच्यावेळी सादर करणे आवश्यक राहील. तसेच, शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांक:सीबीसी-१०/२०१३/प्र.क्र.३५/मावक, दिनांक १५ जुलै, २०१४ अन्वये शैक्षणिक व सामाजिकदृष्टया मागासवर्गाकरीता (ईएसबीसी) देण्यात आलेली जात प्रमाणपत्रे सामाजिक व शैक्षणिकदृष्ट्या मागासवर्गातील (एसईबीसी) आरक्षणाकरीता ग्राहय धरण्यात येतील.

३.८ शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्रमांक: राक्रीधो-२००२/प्र.क्र.६८/क्रीयुसे-२, दिनांक १ जुलै, २०१६, शासन शुध्दीपत्रक क्रमांक:राक्रीधो-२००२/प्र.क्र.६८/क्रीयुसे-२, दिनांक १८ ऑगस्ट, २०१६ तसेच शासन शुध्दीपत्रक क्रमांक:राक्रीधो-२००२/प्र.क्र.६८/क्रीयुसे-२, दिनांक ११ मार्च, २०१९, आणि तदनंतर शासनाने यासंदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशानुसार, प्राविण्य प्राप्त खेळाडू व्यक्तीचे आरक्षण तसेच वयोमर्यादेतील सवलतीसंदर्भात कार्यवाही करण्यात येईल.

३.९ प्राविण्य प्राप्त खेळाडू व्यक्तींसाठी असलेल्या आरक्षणाचा दावा करणा-या उमेदवारांच्या बाबतीत क्रीडा विषयक विहित अर्हता धारण करीत असल्याबाबत सक्षम प्राधिका-याने प्रमाणित केलेले खेळाचे प्राविण्य प्रमाणपत्र पूर्व परीक्षेस अर्ज सादर करण्याच्या अंतिम दिनांकाचे किंवा तत्पूर्वीचे असणे बंधनकारक आहे.

३.१० खेळाचे प्राविण्य प्रमाणपत्र योग्य दर्जाचे असल्याबाबत तसेच तो खेळाडू उमेदवार खेळाडूसाठी आरक्षित पदावरील निवडीकरीता पात्र ठरतो, याविषयीच्या पडताळणीकरीता त्यांचे प्राविण्य प्रमाणपत्र संबंधित विभागीय उपसंचालक कार्यालयाकडे पूर्व परीक्षेस अर्ज सादर करण्याच्या दिनांकापूर्वीच सादर केलेले असणे बंधनकारक आहे. अन्यथा प्राविण्य प्राप्त खेळाडूसाठी आरक्षणाकरीता पात्र समजण्यात येणार नाही.

३.११ कागदपत्रे पडताळणी/मुलाखतीच्यावेळी खेळाडू उमेदवारांनी विहित अर्हता धारण करीत असल्याबाबत सक्षम प्राधिका-याने प्रमाणित केलेले प्राविण्य प्रमाणपत्र तसेच त्यांचे प्राविण्य प्रमाणपत्र योग्य असल्याबाबत तसेच खेळाडू कोणत्या संवर्गातील खेळाडूसाठी आरक्षित पदावरील निवडीकरीता पात्र ठरतो, याविषयीचा सक्षम प्राधिका-याने प्रदान केलेले प्राविण्य प्रमाणपत्र पडताळणीबाबतचा अहवाल सादर केला तरच उमेदवारांचा संबंधित संवर्गातील खेळाडूसाठी आरक्षित पदावर शिफारशी/नियुक्तीकरीता विचार करण्यात येईल.

३.१२ एकापेक्षा जास्त खेळांची प्राविण्य प्रमाणपत्रे असणा-या खेळाडू उमेदवाराने एकाच वेळेस सर्व खेळांची प्राविण्य प्रमाणपत्रे प्रमाणित करण्याकरीता संबंधित उपसंचालक कार्यालयाकडे सादर करणे बंधनकारक आहे.

३.१३ दिव्यांग व्यक्ती हक्क अधिनियम २०१६ च्या आधारे शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक दिव्यांग २०१८/प्र.क्र.११४/१६ अ, दिनांक २९ मे, २०१९ तसेच यासंदर्भात शासनाकडून वेळोवेळी जारी करण्यात आलेल्या आदेशानुसार दिव्यांग व्यक्तींच्या आरक्षणासंदर्भात कार्यवाही करण्यात येईल.

३.१४ दिव्यांग उमेदवारांची पात्रता शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशानुसार राहील.

३.१५ दिव्यांग व्यक्तींसाठी असलेली पदे भरावयाच्या एकूण पदसंख्येपैकी असतील.

३.१६ दिव्यांग व्यक्तींसाठी आरक्षित पदांवर शिफारस करताना उमेदवार कोणत्या सामाजिक प्रवर्गातील आहे, याचा विचार न करता दिव्यांग गुणवत्ता क्रमांकानुसार त्यांची शिफारस करण्यात येईल.

३.१७ शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : कअस १३१५/प्र.क्र.१२०/१४-ब, दिनांक १६ एप्रिल, २०१६ तसेच शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक संकीर्ण १०१२/प्र.क्र.२१३/वि.प्र.-४, दिनांक ११ मार्च, २०१६ नुसार अंधत्व किंवा क्षीणदृष्टी, श्रवणशक्तीतील दोष व चलनवलन विषयक दिव्यांगता किंवा मेंदूचा अर्धांगवायू या प्रकारच्या पात्रतेचे निकष धारण करणारे दिव्यांग उमेदवार गुणवत्तेनुसार सहायक कक्ष अधिकारी व राज्य कर निरीक्षक पदाकरीता शिफारशीसाठी पात्र असतील.

३.१८ शासन अधिसूचना, गृह विभाग, क्रमांक उसप्रे-०३९८/सीआर-४५७/भाग-२/पोल-५ अ, दिनांक १५ ऑक्टोबर, २००३ नुसार दिव्यांग उमेदवार पोलीस उपनिरीक्षक पदाकरीता पात्र नाहीत.

३.१९ दिव्यांग व्यक्तींसाठी असलेल्या वयोमर्यादेचा अथवा इतर कोणत्याही प्रकारचा फायदा घेऊ इच्छिणा-या उमेदवारांनी शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक अप्रकि-२०१८/प्र.क्र.४६/आरोग्य-६, दिनांक १४ सप्टेंबर, २०१८ मधील आदेशानुसार केंद्र शासनाच्या www.swavlambancard.gov.in या संगणकीय प्रणालीदवारे वितरित करण्यात आलेले नवीन नमुन्यातील दिव्यांगत्वाचे प्रमाणपत्र मुलाखतीच्या वेळी सादर करणे अनिवार्य आहे.

३.२० अनाथ व्यक्तींचे आरक्षण शासन निर्णय, महिला व बालविकास विभाग, क्रमांक : अमुजा-२०११/प्र.क्र.२१२/का-३, दिनांक २ एप्रिल, २०१८ तसेच यासंदर्भात शासनाकडून वेळोवेळी जारी करण्यात येणा-या आदेशानुसार राहील.

३.२१ परीक्षेच्या कोणत्याही टप्प्यावर, मागासवर्गीयासाठी विहित केलेली वयोमर्यादा तसेच इतर पात्रता विषयक अटी/निकषांसंदर्भात कोणतीही सूट/सवलत घेतली असल्यास अशा उमेदवारांचा अराखीव (खुला) सर्वसाधारण पदावर शिफारशीकरीता विचार करण्यात येणार नाही.

३.२२ अराखीव (खुला) उमेदवारांकरीता विहित केलेल्या वयोमर्यादा तसेच इतर पात्रता विषयक निकषासंदर्भातील अटींची पुर्तता करणा-या सर्व उमेदवारांचा (मागासवर्गीय उमेदवारांसह) अराखीव (खुला) सर्वसाधारण पदावरील शिफारशीकरीता विचार होत असल्याने, सर्व आरक्षित प्रवर्गातील उमेदवारांनी त्यांच्या प्रवर्गासाठी पद आरक्षित/उपलब्ध नसले तरी, अर्जामध्ये त्यांच्या मूळ प्रवर्गासंदर्भातील माहिती अचूकपणे नमूद करणे बंधनकारक आहे.

३.२३ राज्य कर निरीक्षक व पोलीस उपनिरीक्षक संवर्गातील भरतीकरीता "महाराष्ट्र शासकीय गट-अ व गट-ब (राजपत्रित व अराजपत्रित) पदांवर सरळसेवेने व पदोन्नतीने नियुक्तीसाठी महसुली विभाग वाटप नियम, २०१५" तसेच तद्नंतर यासंदर्भात शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशानुसार कार्यवाही करण्यात येईल.

३.२४ मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल रिट याचिका क्रमांक २०५३/२०१४, जनहित याचिका क्रमांक १७५/२०१८ तसेच इतर न्यायालयीन प्रकरणी होणा-या अंतिम निर्णयाच्या अधीन राहून पदभरतीची कार्यवाही करण्यात येईल.

**४. दिव्यांग उमेदवार :- लेखनिक व अनुग्रह कालावधीबाबत**

४.१ फक्त दृष्टीहीन, अल्पदृष्टी, अस्थिव्यंग, सेरेब्रल पाल्सी आणि डिस्लेक्सियाने बाधित व किमान ४०% कायमस्वरुपी दिव्यांगत्व असलेल्या पात्र उमेदवारांना, ते लिहिण्यासाठी सक्षम नसल्यास, परीक्षा प्रयोजनार्थ गुणवत्तेनुसार आयोगाच्या पूर्व परवानगीने लेखनिकाची मदत घेता येईल व आयोगाच्या पूर्व परवानगीने अनुग्रह कालावधी (Compensatory Time) अनुज्ञेय राहील.

४.२ प्रत्यक्ष परीक्षेच्यावेळी उत्तरे लिहिण्यासाठी सक्षम नसलेल्या, पात्र दिव्यांग उमेदवारांना, लेखनिकाची मदत आणि/अथवा अनुग्रह कालावधीची आवश्यकता असल्यास संबंधित उमेदवाराने ऑनलाईन पध्दतीने आयोगास अर्ज सादर केल्याच्या दिनांकापासून सात (७) दिवसाच्या आत आवश्यक प्रमाणपत्र/कागदपत्रांसह विहित नमुन्यामध्ये आयोगाकडे लेखी विनंती करुन पूर्व परवानगी घेणे आवश्यक आहे.

४.३ लेखनिकाची व्यवस्था उमेदवारांकडून स्वत: केली जाणार आहे की आयोगाच्या कार्यालयामार्फत लेखनिकाची व्यवस्था करावी लागणार आहे, याचा स्पष्ट उल्लेख जाहिरातीस अनुसरुन ऑनलाईन पध्दतीने केलेल्या अर्जामध्ये असल्यासच विहित नमुन्याद्वारे प्राप्त लेखी विनंतीचा विचार केला जाईल.

४.४ अर्जामध्ये मागणी केली नसल्यास तसेच आयोगाची विहित पध्दतीने पूर्व परवानगी घेतली नसल्यास ऐनवेळी लेखनिकाची मदत घेता येणार नाही अथवा अनुग्रह कालावधी अनुज्ञेय असणार नाही.

४.५ परीक्षेकरीता लेखनिकाची मदत आणि/अथवा अनुग्रह कालावधीची परवानगी दिलेल्या पात्र उमेदवारांची यादी आयोगाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात येईल. तसेच लेखनिकाची मदत आणि/अथवा अनुग्रह कालावधीच्या परवानगीबाबत संबंधित उमेदवाराला आयोगाकडील नोंदणीकृत ई-मेलवर कळविण्यात येईल.

४.६ दिव्यांग व्यक्तींना लेखनिक पुरविण्याबाबत व अनुग्रह कालावधी अनुज्ञेय ठरविण्याबाबत मार्गदर्शक सूचना, विविध अर्जाचे नमुने, विशेष सूचना, संबंधित शासन आदेश इत्यादी बाबी आयोगाच्या www.mpsc.gov.in या संकेतस्थळावरील “विकलांग (दिव्यांग) व्यक्ती’” या सदरामध्ये उपलब्ध करुन देण्यात आल्या आहेत, त्यांचे उमेदवारांनी काळजीपूर्वक अवलोकन करावे.

**५. वेतनश्रेणी :-** एस-१४ रूपये ३८,६००-१,२२,८०० अधिक महागाई भत्ता व नियमाप्रमाणे देय इतर भत्ते.

**६. पात्रता :-**

६.१ भारतीय नागरिकत्व

**६.२ वयोमर्यादा :-**

| अ. क्र. | संवर्ग | वयोमर्यादा गणण्याचा दिनांक | वय | | | | | | | दिव्यांग उमेदवार | अनाथ |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | किमान अमागास / मागासवर्गीय | कमाल | | प्राविण्य प्राप्त खेळाडू | | माजी सैनिक, आणिबाणी व अल्पसेवा राजादिष्ट अधिकारी | | | |
| | | | | अमागास | मागासवर्गीय | अमागास | मागासवर्गीय | अमागास | मागासवर्गीय | | |
| १ | सहायक कक्ष अधिकारी | १ मे, २०१९ | १८ | ३८ | ४३ | ४३ | ४३ | ४३ | ४३ | वयाच्या ४५ वर्षापर्यंत | ३८ |
| २ | राज्य कर निरीक्षक | १ एप्रिल, २०१९ | १८ | ३८ | ४३ | ४३ | ४३ | ४३ | ४३ | वयाच्या ४५ वर्षापर्यंत | ३८ |
| ३ | पोलीस उप निरीक्षक | १ मे, २०१९ | १९ | ३१ | ३४ | ३६ | ३६ | ३६ | ३६ | अपात्र | ३१ |

६.३ विहित वयोमर्यादा इतर कोणत्याही बाबतीत शिथिल केली जाणार नाही.

**६.४ शैक्षणिक अर्हता :-**

६.४.१ सांविधिक विद्यापीठाची पदवी किंवा तिच्याशी समतुल्य असणारी शासनाने घोषित केलेली इतर कोणतीही तत्सम अर्हता.

६.४.२ पदवी परीक्षेच्या शेवटच्या वर्षास बसलेले उमेदवार पूर्व परीक्षेस तात्पुरते पात्र असतील, परंतु पूर्व परीक्षेच्या निकालाआधारे मुख्य परीक्षेच्या प्रवेशासाठी पात्र ठरणा-या उमेदवारांनी मुख्य परीक्षेकरीता अर्ज स्वीकारण्यासाठी विहित केलेल्या अंतिम दिनांकापर्यंत पदवी परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक राहील.

६.४.३ अंतर्वासिता (Internship) किंवा कार्यशाळेतील कामाचा अनुभव आवश्यक असेल अशा पदवीधारकाने ही अट मुख्य परीक्षेचे अर्ज स्वीकारण्याच्या विहित अंतिम दिनांकापर्यंत पूर्ण केली असली पाहीजे.

६.४.४ मराठी भाषेचे ज्ञान आवश्यक.

**६.४.५ पोलीस उपनिरीक्षक पदासाठी विकल्प नमूद करणा-या उमेदवारांकडे उपरोक्त अर्हतेसोबत खालीलप्रमाणे किमान शारीरिक अर्हता असणे आवश्यक आहे :-**

| पुरुष | महिला |
|---|---|
| (१) उंची - १६५ सें. मी. (अनवाणी) (कमीत कमी)<br>(२) छाती - न फुगविता ७९ से.मी.<br>फुगविण्याची क्षमता किमान ५ से.मी. आवश्यक | उंची - १५७ सें.मी. (अनवाणी) (कमीत कमी) |

६.४.६ पोलीस उपनिरीक्षक पदावरील नियुक्तीकरीता शिफारस झालेल्या उमेदवारांची शारिरिक मोजमापे नियुक्ती करण्यापूर्वी शासनामार्फत सक्षम प्राधिका-याकडून तपासून घेण्यात येतील. वरीलप्रमाणे विहित शारीरिक पात्रता नसल्यास संबंधित उमेदवार नियुक्तीसाठी अपात्र ठरेल.

**७. सेवाप्रवेशोत्तर शर्ती :-**

**७.१** नियुक्त झालेल्या व्यक्तीस खालील परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक राहील :-

**७.१.१** जेथे प्रचलित नियमानुसार विभागीय/व्यावसायिक परीक्षा विहित केली असेल अथवा आवश्यक असेल तेथे त्यासंबंधी केलेल्या नियमानुसार विभागीय/व्यावसायिक परीक्षा

**७.१.२** हिंदी आणि मराठी भाषा परीक्षेसंबंधी केलेल्या नियमानुसार जर ती व्यक्ती अगोदर परीक्षा उत्तीर्ण झाली नसेल किंवा तिला उत्तीर्ण होण्यापासून सूट मिळाली नसेल तर ती परीक्षा

**७.१.३** महाराष्ट्र शासनाच्या माहिती तंत्रज्ञान संचालनालयाने वेळोवेळी विहित केलेले संगणक हाताळणीबाबतची प्रमाणपत्र परीक्षा

**८. परीक्षेचे टप्पे -**

**८.१** प्रस्तुत भरती प्रक्रिया खालील टप्प्यामध्ये राबविण्यात येईल :-

| अ.क्र. | संवर्ग | टप्पे | मुख्य परीक्षेचे गुण | शारीरिक चाचणीचे गुण | मुलाखतीचे गुण |
|---|---|---|---|---|---|
| १ | सहायक कक्ष अधिकारी | मुख्य परीक्षा | २०० | -- | -- |
| २ | राज्य कर निरीक्षक | | | | |
| ३ | पोलीस उप निरीक्षक | मुख्य परीक्षा, शारीरिक चाचणी व मुलाखत | | १०० | ४० |

**८.२** प्रत्येक संवर्ग/पदाकरीता विहित करण्यात आलेल्या परीक्षा योजना व अभ्यासक्रमानुसार स्वतंत्र मुख्य परीक्षा घेण्यात येईल. याबाबतचा सविस्तर तपशील आयोगाच्या संकेतस्थळावरील "**स्पर्धा परीक्षा**" अंतर्गत "**परीक्षा योजना**" विभागातील "**महाराष्ट्र दुय्यम सेवा अराजपत्रित, गट-ब परीक्षेची परीक्षा योजना**" मध्ये उपलब्ध करुन दिला आहे.

**८.३** मुख्य परीक्षेचा संयुकत पेपर क्रमांक १ तसेच प्रत्येक संवर्ग/पदाकरीता स्वतंत्रपणे घेण्यात येणा-या पेपर क्रमांक २ चे गुण एकत्रित करुन प्रत्येक परीक्षेची निकाल प्रक्रिया स्वतंत्रपणे राबविण्यात येईल.

**८.४ शारीरिक चाचणी (फक्त पोलीस उपनिरीक्षक पदाकरीता) :-**

**८.४.१** मुख्य लेखी परीक्षेच्या निकालाआधारे शारीरिक चाचणीसाठी अर्हताप्राप्त ठरलेल्या उमेदवारांना शारीरिक चाचणी द्यावी लागते हे विचारात घेऊन उमेदवारांनी वेळीच त्यासाठी सराव व पूर्वतयारी करावी. मुख्य लेखी परीक्षेच्या निकालानंतर सर्वसाधारणपणे दोन आठवड्याच्या अंतराने कधीही शारीरिक चाचणी आयोजित केली जाईल. सरावासाठी पुरेसा वेळ मिळाला नसल्याच्या कारणास्तव शारीरिक चाचणीचे दिनांक बदलून मागता येणार नाहीत किंवा त्याबाबत तक्रार करता येणार नाही.

**८.४.२** आयोगाकडून शारीरिक चाचणीचा कार्यक्रम निश्चित होताच तो आयोगाच्या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात येईल. तसेच, आयोगाच्या ऑनलाईन अर्ज प्रणालीतील संबंधित पात्र उमेदवारांना त्यांच्या प्रोफाईलद्वारे कळविण्यात येईल.

**८.४.३** आयोगाने निश्चित केलेल्या दिनांकास व ठिकाणी संबंधित उमेदवाराने शारीरिक चाचणीसाठी उपस्थित राहणे आवश्यक आहे. शारीरिक चाचणीसाठी निश्चित केलेल्या दिनांक व वेळेमध्ये बदल करण्याबाबतची विनंती मान्य केली जाणार नाही व त्यामुळे उमेदवाराची शारीरिक चाचणीची संधी वाया गेल्यास त्याची जबाबदारी संबंधित उमेदवाराची असेल.

**८.४.४** वैद्यकीय कारणास्तव शारीरिक चाचणीचा दिनांक बदलून देण्याची विनंती करणा-या उमेदवारांना वैद्यकीय प्रमाणपत्रामध्ये नमूद केलेल्या आजार/दुखापत, त्याचे स्वरुप, गांभीर्य व सत्यता तपासणीसाठी लगेचच आयोगाने निश्चित केलेल्या ठिकाणी व वेळेस सक्षम वैद्यकीय मंडळापुढे पाठविण्यात येईल.तसेच वैद्यकीय मंडळाने फिटनेस (Fitness) प्रमाणपत्र प्रदान केले तरच त्यांना आयोगाने निश्चित केलेल्या ठिकाणी व वेळेस शारीरिक चाचणीसाठी उपस्थित राहण्याची परवानगी देण्यात येईल.

**८.४.५** वैद्यकीय कारणास्तव शारीरिक चाचणीसाठी मुदतवाढ मागणा-या उमेदवारांच्या बाबतीत सत्यता तपासणीनंतर वैद्यकीय मंडळाकडून प्रतिकूल अहवाल प्राप्त झाल्यास संबंधित उमेदवाराला शारीरिक चाचणीची संधी नाकारण्यात येईल. अशा प्रकरणी आयोगाची फसवणूक करण्याचा प्रयत्न समजून संबंधित उमेदवारांवर कायदेशीर कारवाई करण्यात येईल. तसेच उमेदवाराची संबंधित परीक्षेची उमेदवारी रद्द करण्यात येऊन आयोगाच्या स्वेच्छाधिकारानुसार आयोगामार्फत आयोजित सर्व परीक्षा व निवडीपासून उमेदवाराला प्रतिरोधित (Debar) करण्यात येईल. त्याव्यतिरिक्त संबंधित उमेदवारांवर शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल.

**८.४.६** अत्यंत अपवादात्मक परिस्थितीत तसेच समर्थनीय कारणासह अर्ज केलेल्या उमेदवारांना शारीरिक चाचणीचा दिनांक व वेळ बदलून देण्याच्या विनंतीबाबत आयोगाच्या स्वेच्छाधिकारानुसार, विचार करण्यात येईल. एखाद्या प्रकरणी आयोगाने विनंती अमान्य केली असेल तर संबंधित उमेदवाराला पूर्व नियोजित वेळापत्रकानुसार निश्चित केलेल्या दिनांक व वेळेनुसार शारीरिक चाचणीसाठी उपस्थित रहावे लागेल. त**दनं**तर उमेदवाराला पुढील संधी दिली जाणार नाही.

**८.५ प्रमाणपत्र पडताळणी :-**

**८.५.१ फक्त पोलीस उपनिरीक्षक पदाकरीता :-**

(१) लेखी परीक्षा व शारीरिक चाचणीच्या आधारे मुलाखतीसाठी पात्र ठरणा-या उमेदवारांच्या मुलाखती आयोगाच्या कार्यक्रमानुसार तसेच आयोगाने निश्चित केलेल्या ठिकाणी व विहित वेळेस घेण्यात येतील.

(२) मुलाखतीसाठी पात्र ठरलेल्या उमेदवारांची पात्रता जाहिरात/अधिसूचनेतील अर्हता/अटी व शर्तीनुसार मूळ कागदपत्राच्या आधारे तपासली जाईल आणि अर्जातील दाव्यानुसार मूळ कागदपत्र सादर करणा-या उमेदवारांची मुलाखत घेतली जाईल.

(३) पात्रतेसंदर्भातील अथवा विविध सवलती संदर्भातील विहित नमुन्यातील मूळ प्रमाणपत्रे मुलाखतीच्यावेळी सादर न केल्यास कागदपत्रे सादर करण्याकरीता कोणतीही मुदतवाढ देण्यात येणार नाही. तसेच, संबंधित उमेदवाराची उमेदवारी रद्द करण्यात येईल व मुलाखत घेण्याचे नाकारले जाईल.

(४) लेखी परीक्षा, शारीरिक चाचणी व मुलाखतीमध्ये प्राप्त केलेल्या एकूण गुणांच्या आधारे उमेदवारांची अंतिम निवड करण्यात येईल.

**८.५.२ राज्य कर निरीक्षक व सहायक कक्ष अधिकारी पदाकरीता :-**

(१) सहायक कक्ष अधिकारी तसेच राज्य कर निरीक्षक पदाच्या संबंधित लेखी परीक्षेच्या निकालाच्या आधारे शिफारस पात्र ठरलेल्या उमेदवारांना प्रमाणपत्र पडताळणीसाठी सक्षम प्राधिका-यांकडून बोलविण्यात येईल.

(२) आयोगाने निश्चित केलेल्या किमान सीमारेषेनुसार शिफारस पात्र ठरलेल्या उमेदवारांची पात्रता जाहिरात/ शासन परिपत्रकातील अर्हता/अटी व शर्तीनुसार मूळ कागदपत्राच्या आधारे सक्षम प्राधिका-यांकडून तपासली जाईल.

(३) अर्जातील दाव्यानुसार मूळ कागदपत्र सादर करणा-या उमेदवारांची प्रमाणपत्र पडताळणी केली जाईल.

(४) अर्जातील दाव्यानुसार विहित कागदपत्रे सादर करू न शकणा-या उमेदवारांची शिफारस/नियुक्ती रद्द करण्यात येईल. तसेच त्याकरीता कोणतीही मुदतवाढ देण्यात येणार नाही.

(५) वरीलप्रमाणे लेखी परीक्षेच्या निकालाच्या आधारे शिफारस पात्र ठरलेल्या उमेदवारांची प्रमाणपत्र पडताळणी सक्षम प्राधिका-यांकडून निश्चित करण्यात आलेल्या कार्यक्रमानुसार तसेच सक्षम प्राधिका-याने निश्चित केलेल्या ठिकाणी व विहित वेळेस घेण्यात येतील. त्याकरीता उमेदवारास स्वखर्चाने उपस्थित रहावे लागेल.

(६) अर्जातील दाव्यानुसार सक्षम प्राधिका-याकडून करण्यात आलेल्या प्रमाणपत्र पडताळणीच्या आधारे पात्र ठरलेल्या उमेदवारांनाच नियुक्ती देण्याची कार्यवाही सक्षम प्राधिका-यांकडून करण्यात येईल.

**९. मुख्य परीक्षेस प्रवेश :-**

९.१ महाराष्ट्र दुय्यम सेवा अराजपत्रित, गट-ब पूर्व परीक्षा - २०१९ च्या निकालाच्या आधारे संबंधित संवर्ग/पदाच्या मुख्य परीक्षेच्या प्रवेशासाठी पात्र ठरलेल्या आणि पूर्व परीक्षेच्या जाहिरातीमध्ये नमूद शैक्षणिक अर्हता व अन्य अटींची दिनांक ५ जुलै, २०१९ रोजी किंवा त्यापूर्वी पुर्तता करणा-या उमदेवारास मुख्य परीक्षेच्या प्रवेशासाठी पात्र समजण्यात येईल.

९.२ संबंधित संवर्ग/पदाच्या मुख्य परीक्षेच्या प्रवेशासाठी पात्र उमेदवाराने आयोगाकडून निश्चित करण्यात आलेल्या कालावधीत आयोगाच्या https://mahampsc.mahaonline.gov.in या संकेतस्थळाव्दारे फक्त ऑनलाईन पध्दतीने आवश्यक अर्ज/माहिती सादर करणे आवश्यक राहील.

९.३ पूर्व परीक्षेकरीता आयोगास अर्जादवारे सादर केलेल्या माहितीच्या आधारेच प्रस्तुत मुख्य परीक्षेकरीता आवश्यक अर्ज/माहिती ऑनलाईन पध्दतीने सादर करणे आवश्यक राहील.

९.४ एकापेक्षा अधिक संवर्ग/पदाच्या मुख्य परीक्षेच्या प्रवेशासाठी पात्र ठरलेल्या उमेदवारास प्रत्येक संवर्ग/पदासाठी स्वतंत्रपणे अर्ज सादर करुन प्रत्येक संवर्ग/पदाच्या मुख्य परीक्षेसाठी स्वतंत्र विहित परीक्षा शुल्क भरावे लागेल.

**१०. शुल्क (रुपये) : १०.१** :- अमागास - **रु. ५२४/- १०.२** :- मागासवर्गीय - **रु. ३२४/-**

**१०.३** प्रत्येक संवर्ग/पदाकरीता स्वतंत्र अर्ज करुन शुल्क सादर केलेल्या उमेदवारांनाच संबंधित संवर्ग/पदाच्या मुख्य परीक्षेकरीता पात्र समजण्यात येईल.

**११. अर्ज करण्याची पद्धत :-**

११.१ प्रस्तुत परीक्षेसाठी अर्ज फक्त ऑनलाईन पद्धतीने स्वीकारण्यात येतील.

११.२ पात्र उमेदवाराला वेब-आधारित (Web-based) ऑनलाईन अर्ज https://mahampsc.mahaonline.gov.in या संकेतस्थळाद्वारे **दिनांक २१ जून, २०१९ ते ५ जुलै, २०१९** या कालावधीतच सादर करणे आवश्यक राहील.

११.३ ऑनलाईन पद्धतीने अर्ज सादर करण्याच्या सविस्तर सूचना आयोगाच्या https://mahampsc.mahaonline.gov.in तसेच www.mpsc.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध आहेत.

११.४ आयोगास अर्ज सादर करताना माध्यमिक शालांत प्रमाणपत्रावर असलेल्या नावाप्रमाणेच नोंदणी करणे व आयोगास अर्ज सादर करणे आवश्यक आहे. अन्यथा आयोगाच्या सूचनांचे उल्लंघन समजून कारवाई करण्यात येईल.

११.५ आयोगास चुकीची माहिती सादर करणा-या उमेदवारास सदर परीक्षेसाठी व यापुढील सर्व निवडीकरिता अपात्र ठरविण्यात येईल.

११.६ आयोगास अर्ज सादर केल्यानंतर विहित मुदतीत परीक्षा शुल्क भरल्याशिवाय अर्ज विचारात घेतला जाणार नाही.

११.७ परीक्षा शुल्काचा भरणा करण्याकरिता उमेदवारांनी खाली नमूद केलेल्या पद्धतींचा अवलंब करावा :-

११.७.१ शुल्क भरण्याकरिता मुख्य पृष्ठाच्या डाव्या भागावरील '**माझे खाते**' या लिंक वर क्लिक करावे.

११.७.२ '**माझे खाते**' या लिंक वर क्लिक केल्यानंतर '**माझे अप्लिकेशन**' सदरातील '**स्पर्धात्मक परीक्षा**'या लिंक वर क्लिक करावे.

११.७.३ '**स्पर्धात्मक परीक्षा**' या लिंक वर क्लिक केल्यानंतर अर्ज केलेल्या पदांची यादी शुल्क भरल्याच्या / न भरल्याच्या नोंदीसह दिसेल. 'Unpaid' लिहिलेल्या पद/परीक्षेसमोर ' Pay Now' अशी लिंक उपलब्ध असेल.

११.७.४ 'Pay Now ' या लिंक वर क्लिक केल्यानंतर तीन पर्याय उपलब्ध होतील. (अ) ऑनलाईन पेमेंट (ब) नागरी सुविधा केंद्र (क) चलनाद्वारे

११.७.५ क्रेडिट कार्ड, डेबिट कार्ड अथवा नेटबँकिंगच्या सहाय्याने ऑनलाईन परीक्षा शुल्क अदा करता येईल.

११.७.६ नागरी सुविधा केंद्र हा पर्याय निवडल्यास, उपलब्ध होणा-या पावतीची प्रत घेऊन नागरी सुविधा केंद्र अथवा संग्राम केंद्रात जाऊन शुल्काचा भरणा केला जाऊ शकतो. सदर कार्यवाही अर्ज सादर करण्याच्या अंतिम दिनांकापूर्वी पूर्ण करणे आवश्यक राहील.

११.७.७ चलनाद्वारे परीक्षाशुल्क भरण्याचा पर्याय निवडल्यास, उपलब्ध होणा-या चलनाची प्रत घेऊन भारतीय स्टेट बँकेच्या कोणत्याही शाखेत, बँकेच्या कार्यालयीन वेळेत शुल्काचा भरणा केला जाऊ शकतो.

११.७.८ भारतीय स्टेट बँकेमध्ये चलनाद्वारे शुल्क भरण्याचा पर्याय निवडल्यास अर्ज सादर केल्याच्या दोन तासानंतर अथवा शेवटच्या दिवशी अर्ज सादर केल्यास त्यापुढील कामकाजाच्या दिवशी बँकेच्या कार्यालयीन वेळेत परीक्षा शुल्क भरणे आवश्यक आहे.

११.७.९ **विहित पध्दतीने अर्ज सादर करुन ऑनलाईन शुल्क भरण्याची कार्यवाही, तसेच भारतीय स्टेट बँकेमध्ये चलनाद्वारे परीक्षा शुल्क भरावयाचे झाल्यास चलनाची प्रत घेण्याची कार्यवाही दिनांक ५ जुलै, २०१९ रोजी २३.५९ वाजेपर्यंत पूर्ण करणे आवश्यक आहे. त्यानंतर सदर वेबलिंक बंद होईल.**

११.७.१० **चलनाद्वारे परीक्षाशुल्क भरावयाचे झाल्यास भारतीय स्टेट बँकेमध्ये दिनांक ६ जुलै, २०१९ पर्यंत बँकेच्या कार्यालयीन वेळेत भरणे बंधनकारक आहे. विहित दिनांकानंतर परीक्षा शुल्क भरल्यास वैध मानले जाणार नाही, तसेच परीक्षा शुल्काचा परतावाही केला जाणार नाही.**

११.७.११ ऑनलाईन पध्दतीने परीक्षा शुल्काचा भरणा केल्यानंतर उमेदवाराला त्याच्या प्रोफाईलमध्ये परीक्षा शुल्काचा भरणा झाला आहे किंवा कसे याची स्थिती (status) लगेचच अवगत होईल. ऑनलाईन पध्दतीने परीक्षा शुल्क भरले असल्याबाबत Logout करण्यापूर्वीच खात्री करणे अथवा परीक्षा शुल्काचा भरणा झाल्याबाबतची स्थिती उपलब्ध नसल्यास पुन्हा शुल्क भरण्याची अथवा चलन घेण्याबाबतची कार्यवाही प्रस्तुत परीक्षेच्या अर्ज सादर करण्याच्या अंतिम दिनांकापूर्वीच करणे आवश्यक आहे. विहित दिनांकानंतर यासंदर्भातील कोणत्याही प्रकारच्या तक्रारीची दखल घेतली जाणार नाही.

**११.८ केंद्र निवड :-**

११.८.१ अर्ज सादर करतानाच जिल्हा केंद्राची निवड करणे आवश्यक आहे.

११.८.२ जिल्हा केंद्र बदलाबाबतची विनंती कोणत्याही परिस्थितीत अथवा कोणत्याही कारणास्तव मान्य करण्यात येणार नाही.

**१२. प्रवेशप्रमाणपत्र :-**

१२.१ मुख्य परीक्षेचा संयुक्त पेपर क्रमांक १ तसेच उमेदवार ज्या संवर्ग/पदाच्या मुख्य परीक्षेच्या प्रवेशाकरीता पात्र ठरला आहे, त्या संवर्ग/पदाच्या मुख्य परीक्षेच्या पेपर क्रमांक २ करीता स्वतंत्र प्रवेशप्रमाणपत्र परीक्षेपूर्वी सर्वसाधारणपणे **७** दिवस अगोदर उमेदवाराच्या प्रोफाईलदवारे उपलब्ध करुन देण्यात येईल. त्याची प्रत संबंधित पेपरपूर्वी डाऊनलोड करुन घेणे व परीक्षेच्या वेळी सादर करणे आवश्यक आहे.

**१२.२** प्रत्येक परीक्षेच्या वेळी प्रत्येक पेपरकरीता उमेदवाराने स्वत:चे स्वतंत्र प्रवेशप्रमाणपत्र आणणे सक्तीचे आहे. त्याशिवाय, परीक्षेस प्रवेश दिला जाणार नाही.

**१२.३** परीक्षेस येतेवेळी ओळखीच्या पुराव्यासाठी स्वत:चे आधार कार्ड, निवडणूक आयोगाचे ओळखपत्र, पासपोर्ट, पॅन कार्ड किंवा स्मार्ट कार्ड प्रकारचे ड्रायव्हिंग लायसेन्स यापैकी किमान कोणतेही **एक मूळ** ओळखपत्र तसेच मूळ ओळखपत्राची रंगीत छायांकित प्रत सोबत आणणे अनिवार्य आहे.

**१२.४** आधार कार्डच्या ऐवजी भारतीय विशिष्ट ओळख प्राधिकरण (UIDAI) च्या संकेतस्थळावरुन डाऊनलोड केलेले ई-आधार सादर करणा-या उमेदवारांच्या बाबतीत ई-आधार वर उमेदवाराचे नाव, पत्ता, लिंग, फोटो, जन्मदिनांक या तपशीलासह आधार निर्मितीचा दिनांक (Date of Aadhaar generation) व आधार डाऊनलोड केल्याचा दिनांक असल्यासच तसेच सुस्पष्ट फोटोसह **रंगीत प्रिंट** मध्ये आधार डाऊनलोड केले असल्यासच ई-आधार वैध मानण्यात येईल.

**१२.५** नावांमध्ये बदल केलेला असल्यास विवाह निबंधक यांनी दिलेला दाखला (विवाहित स्त्रियांच्या बाबतीत), नावांत बदल झाल्यासंबंधी अधिसूचित केलेले राजपत्र किंवा राजपत्रित अधिकारी यांच्याकडून नावांत बदल झाल्यासंबंधीचा दाखला व त्याची छायांकित प्रत परीक्षेच्यावेळी सादर करणे आवश्यक आहे.

**१३. परीक्षेस प्रवेश**

**१३.१ फक्त पेन, पेन्सिल, प्रवेशप्रमाणपत्र, ओळखीचा मूळ पुरावा व ओळखीच्या पुराव्याची रंगीत छायांकित प्रत अथवा प्रवेशप्रमाणपत्रावरील सूचनेनुसार आयोगाने परवानगी दिलेल्या साहित्यासह उमेदवाराला परीक्षा कक्षात प्रवेश देण्यात येईल.**

**१३.२** स्मार्ट वॉच, डिजीटल वॉच, मायक्रोफोन, मोबाईल फोन, कॅमेरा अंतर्भूत असलेली कोणत्याही प्रकारची साधने, सिमकार्ड, ब्लू टूथ, दूरसंचार साधने म्हणून वापरण्या योग्य कोणतीही वस्तू, इलेक्ट्रॉनिक उपकरणे, वहया, नोटस, परवानगी नसलेली पुस्तके, बॅग्ज, परिगणक (calculator) इत्यादी प्रकारची साधने/ साहित्य परीक्षा केंद्राच्या परिसरात तसेच परीक्षा कक्षात आणण्यास, स्वत:जवळ बाळगण्यास, त्याचा वापर करण्यास अथवा त्याच्या वापरासाठी इतरांची मदत घेण्यास सक्त मनाई आहे. असे साहित्य आणल्यास ते परीक्षा केंद्राबाहेर ठेवण्याची व त्याच्या सुरक्षिततेची जबाबदारी संबंधित उमेदवाराची राहील.

**१३.३** आयोगाने परवानगी नाकारलेले कोणत्याही प्रकारचे अनधिकृत साधन/साहित्य परीक्षेच्यावेळी संबंधित उपकेंद्राच्या मुख्य प्रवेशद्वारावरच ठेवावे लागेल. अशा साधन/साहित्याच्या सुरक्षिततेची जबाबदारी संबंधित उमेदवाराची राहील. यासंदर्भातील कोणत्याही प्रकारच्या नुकसानीस आयोग, जिल्हा प्रशासन किंवा संबंधित शाळा/महाविद्यालय व्यवस्थापन जबाबदार राहणार नाही.

**१४. बायोमॅट्रिक पडताळणी :**

**१४.१** निवड प्रक्रियेच्या कोणत्याही टप्प्यावर उमेदवाराच्या बायोमॅट्रिक सत्यापनासाठी **(Genuineness)** डिजिटल स्वरुपात उमेदवारांच्या बोटांचे ठसे आणि/अथवा बुब्बुळाच्या आधारे पडताळणी केली जाईल.

**१४.२** बायोमॅट्रिक पडताळणीच्या वेळी उमेदवारांनी त्यांच्या बोटांचे ठसे योग्यरित्या स्वीकारले गेले असल्याची खात्री करावी.

**१४.३** बायोमॅट्रिक पडताळणीवेळी विसंगती आढळून आल्यास उमेदवारी नाकारली जावू शकते. तसेच पडताळणीच्यावेळी उमेदवार अस्सल नसल्याचे **(not genuine)** आढळून आल्यास त्याच्यावरील कायदेशीर कारवाईव्यतिरिक्त उमेदवारी रद्द होवू शकते, शिवाय आयोगाच्या स्वेच्छाधिकारानुसार प्रतिरोधाची कारवाई होवू शकते.

**१४.४** परीक्षेच्यावेळी बायोमॅट्रिक पडताळणीकरीता अडचण निर्माण होवून परीक्षेस प्रवेश नाकारला जावू नये, याची उमेदवाराने स्वत: दक्षता घेणे आवश्यक आहे. त्याकरीता परीक्षेच्या दिवशी उमेदवाराने हातावर मेहंदी, शाई, रसायन इत्यादी प्रकारची कोणतीही बाहयवस्तु/पदार्थ लावू नये.

**१४.५** उमेदवारांनी आधार क्रमांक त्यांच्या खात्यात नमूद केले असले तरी काही उमेदवारांनी भारतीय विशिष्ट ओळख प्राधिकरण (UIDAI) द्वारे उपलब्ध करुन देण्यात आलेल्या लॉक / अनलॉक सुविधेद्वारा त्यांची आधार क्रमांकाशी संलग्नित बायोमेट्रीक माहिती लॉक केली असल्यास त्यांचे परीक्षेच्या वेळी आधार प्रमाणीकरण (Aadhaar Authentication) व पर्यायाने बायोमेट्रिक पडताळणी न होण्याची शक्यता आहे. परीक्षेच्या वेळी आधार क्रमांकाच्या आधारे बायोमेट्रिक पडताळणी करण्याकरीता उमेदवारांची आधार संलग्नित बायोमेट्रिक माहिती अनलॉक (Unlock) असणे आवश्यक आहे. यास्तव, आधार प्रमाणीकरणाकरीता बायोमेट्रिक माहिती लॉक केली असणा-या उमेदवारांनी परीक्षा / मुलाखत / शारिरीक चाचणीस उपस्थित राहण्यापूर्वी भारतीय विशिष्ट ओळख प्राधिकरण (UIDAI) च्या संकेतस्थळावरुन बायोमेट्रिक माहिती अनलॉक (Unlock) करुन प्रमाणीकरणाकरीता खुली करावी. अन्यथा परीक्षा / मुलाखतीकरीता उमेदवाराला प्रवेश नाकारला जाऊ शकतो.

**१५.** प्रस्तुत अधिसूचनेमध्ये परीक्षेसंदर्भातील संक्षिप्त तपशील दिलेला आहे. अर्ज स्वीकारण्याची पध्दत, आवश्यक अर्हता, आरक्षण, वयोमर्यादा, शुल्क, निवडीची सर्वसाधारण प्रक्रिया, परीक्षा योजना, अभ्यासक्रम इत्यादीबाबतच्या सविस्तर तपशिलासाठी आयोगाच्या www.mpsc.gov.in या संकेतस्थळावरील स्पर्धा परीक्षेअंतर्गत '**उमेदवारांना सर्वसाधारण सूचना**' तसेच "**परीक्षेची योजना**" विभागातील ' **महाराष्ट्र दुय्यम सेवा अराजपत्रित, गट-ब परीक्षेची परीक्षा योजना**' मध्ये उपलब्ध करुन देण्यात आलेल्या माहितीचे कृपया अवलोकन करावे. आयोगाच्या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात आलेली माहिती व अधिसूचना अधिकृत समजण्यात येईल.

**१६.** प्रस्तुत परीक्षेचा सविस्तर अभ्यासक्रम आयोगाच्या www.mpsc.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध आहे.

**१७.** सविस्तर अधिसूचना आयोगाच्या www.mpsc.gov.in तसेच https://mahampsc.mahaonline.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध आहे.

ठिकाण : मुंबई.
दिनांक : २१ जून, २०१९

उप सचिव, परीक्षा पूर्व
महाराष्ट्र लोकसेवा आयोग.

(१) आयोगाच्या कार्यालयात, परीक्षा कक्षात, परीक्षा केंद्राच्या परिसरात, तसेच, शारीरिक चाचणी व मुलाखतीच्या वेळी मोबाईल फोन, अथवा इतर कोणत्याही प्रकारची इलेक्ट्रॉनिक साधने आणण्यास व वापरण्यास सक्त मनाई आहे. (२) मुलाखतीच्यावेळी सर्व आवश्यक मूळ प्रमाणपत्र सादर न केल्यास सदर परीक्षेची उमेदवारी नाकारली जाईल.




सत्यमेव जयते

महाराष्ट्र शासन

# महाराष्ट्र लोकसेवा आयोग

मुख्य कार्यालय : ५, ७, ८ वा मजला, कुपरेज टेलिफोन निगम इमारत, महर्षि कर्वे मार्ग, कुपरेज, मुंबई - ४०००२१ ☎२२७९५९००
फोर्ट कार्यालय : बँक ऑफ इंडिया इमारत, ३ रा मजला, फोर्ट, मुंबई-४००००१ ☎२२१०२२२२
Email ID : contact-secretary@mpsc.gov.in Website : https://mpsc.gov.in , https://mpsconline.gov.in


क्रमांक : १४४२(२)(२)/२०१९/१३-अ दिनांक : १२ ऑगस्ट, २०२१.

## -: घोषणा :-

विषय : सहायक कक्ष अधिकारी, महाराष्ट्र दुय्यम सेवा, अराजपत्रित, गट-ब (मुख्य) परीक्षा – २०१९, पदसंख्या व आरक्षणातील बदलाबाबत.

संदर्भ : १. जाहिरात क्रमांक ०१/२०१९, दिनांक ९ जानेवारी, २०१९.
२. अधिसूचना क्रमांक : एनओटी-३६१८/सीआर-३१/२०१८/तीन, दिनांक २१ जून, २०१९.
३. घोषणा क्रमांक : एएसपी-०३१९/सीआर-५३ अ/२०१८/तीन, दिनांक ७ नोव्हेंबर, २०१९.
४. घोषणा क्रमांक : १४४२(२)(२)/२०१९/१३-अ, दिनांक १३ फेब्रुवारी, २०२०.

महाराष्ट्र शासनाच्या सामान्य प्रशासन विभागाच्या अधिपत्याखालील सहायक कक्ष अधिकारी संवर्गातील भरतीकरीता दिनांक ९ जानेवारी, २०१९ रोजी प्रसिध्द करण्यात आलेल्या जाहिरातीस अनुसरून महाराष्ट्र दुय्यम सेवा, अराजपत्रित, गट-ब (पूर्व) परीक्षा - २०१९ ही परीक्षा रविवार, दिनांक २४ मार्च, २०१९ रोजी घेण्यात आली. तसेच संदर्भांकित अधिसूचनेस अनुलक्षून विषयांकित पदाकरीता मुख्य परीक्षा दिनांक २८ जुलै, २०१९ व दिनांक २५ ऑगस्ट, २०१९ रोजी घेण्यात आली. प्रस्तुत मुख्य परीक्षेचा निकाल दिनांक १७ मार्च, २०२० रोजी जाहिर करण्यात आला.

**२.** सामाजिक व शैक्षणिकदृष्टया मागास प्रवर्गाच्या आरक्षणाच्या संदर्भात मा. सर्वोच्च न्यायालयामध्ये दाखल सिव्हिल अपील क्रमांक ३१२३/२०२० या प्रकरणी मा. सर्वोच्च न्यायालयाच्या दिनांक ५ मे, २०२१ रोजीच्या न्यायनिर्णयानुसार सदर प्रवर्गाचे आरक्षण रद्दबातल ठरविण्यात आल्यामुळे शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक बीसीसी-२०२०/प्र.क्र.३२०/१६ब, दिनांक ५ जुलै, २०२१ अन्वये भरतीप्रक्रिया राबविण्यासंदर्भात शासनाकडून सविस्तर मार्गदर्शक सूचना जारी करण्यात आल्या आहेत. सदर शासन निर्णयातील तरतुदीनुसार सामाजिक व शैक्षणिकदृष्टया मागास प्रवर्गाकरीता आरक्षित असलेली पदे अराखीव पदांमध्ये रुपांतरित करून संबंधित परीक्षेची निकाल प्रक्रिया राबविणे क्रमप्राप्त ठरते.

**३.** प्रस्तुत दिनांक ५ जुलै, २०२१ रोजीच्या शासन निर्णयातील तरतुदींच्या आधारे सामाजिक व शैक्षणिकदृष्टया मागास प्रवर्गाकरिता आरक्षित पदे अराखीव पदांमध्ये रुपांतरित केल्यानंतर विषयांकित सहायक कक्ष अधिकारी, महाराष्ट्र दुय्यम सेवा, अराजपत्रित, गट-ब (मुख्य) परीक्षा - २०१९ मधून भरावयाच्या एकूण २४ पदांचा सुधारित तपशील खालीलप्रमाणे आहे.

| सहायक कक्ष अधिकारी, महाराष्ट्र दुय्यम सेवा, अराजपत्रित, गट-ब (मुख्य) परीक्षा - २०१९ (एकूण २४ पदे) | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| **प्रवर्ग** | **अ.जा.** | **अ.ज.** | **वि.जा. (अ)** | **भ.ज. (ब)** | **भ.ज. (क)** | **भ.ज. (ड)** | **इ. मा. व.** | **वि. मा. प्र.** | **एकूण आरक्षित पदे** | **अराखीव पदे** | **एकूण पदे** |
| **पदसंख्या** | ५ | २ | १ | -- | १ | -- | १ | -- | १० | १३+१# | २४ |
| **रिक्त जागांचे प्रवर्गनिहाय सामाजिक/समांतर आरक्षणाचे विवरणपत्र खालीलप्रमाणे आहे :-** | | | | | | | | | | | |
| **सर्वसाधारण** | ३ | १ | १ | -- | १ | -- | १ | -- | ७ | १० | १७ |
| **महिला** | २ | १ | -- | -- | -- | -- | -- | -- | ३ | ४ | ७ |
| **दिव्यांग** | **एकूण १ पद = श्रवणशक्तीतील दोष – १ पद** | | | | | | | | | | |
| **#महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कार्यालयातील पद** | | | | | | | | | | | |

**४.** सामाजिक व शैक्षणिकदृष्टया मागास प्रवर्गाच्या ज्या उमेदवारांनी अराखीव प्रवर्गासाठी विहित करण्यात आलेली वयोमर्यादा ओलांडली असेल त्यांनी वयोमर्यादेतील सवलतीकरीता तद्अनुषंगिक प्रमाणपत्र नियुक्तीच्यावेळी सादर करणे अनिवार्य राहील.

**५.** उपरोक्त सुधारीत पदसंख्या व तरतुदींआधारे विषयांकित सहायक कक्ष अधिकारी, महाराष्ट्र दुय्यम सेवा, अराजपत्रित, गट-ब (मुख्य) परीक्षा - २०१९ करीता भरती प्रक्रिया राबविण्यात येईल.

ठिकाण : मुंबई.

उप सचिव (परीक्षा-१),
महाराष्ट्र लोकसेवा आयोग.




क्र. १४४२(२(२)/२०१९/तेरा-अ दिनांक : २७ ऑगस्ट, २०२१.

महाराष्ट्र दुय्यम सेवा अराजपत्रित, गट-ब (मुख्य) परीक्षा - २०१९
सहायक कक्ष अधिकारी पदाचा सुधारित अंतिम निकाल
जाहिरात क्र. ०१/२०१९ व अधिसूचना क्र. १०/२०१९

## -: सुधारित अंतिम निकालाची घोषणा :-

महाराष्ट्र लोकसेवा आयोगातर्फे दिनांक २८ जुलै, २०१९ व दिनांक २५ ऑगस्ट, २०१९ रोजी घेण्यात आलेल्या महाराष्ट्र दुय्यम सेवा अराजपत्रित, गट-ब (मुख्य) परीक्षा - २०१९ चा सहायक कक्ष अधिकारी पदाचा अंतिम निकाल दिनांक १७ मार्च, २०२० रोजी जाहीर करण्यात आला होता. दरम्यानच्या कालावधीत मा. सर्वोच्च न्यायालयामध्ये सामाजिक व शैक्षणिकदृष्टया मागास प्रवर्गाच्या आरक्षणाच्या अनुषंगाने दाखल सिव्हिल अपील क्रमांक ३१२३/२०२० या न्यायिक प्रकरणी मा. सर्वोच्च न्यायालयाकडून दिनांक ५ मे, २०२१ रोजी दिलेल्या न्यायनिर्णयानुसार शासन सेवेतील सामाजिक व शैक्षणिकदृष्टया मागास प्रवर्गाचे आरक्षण रद्दबातल ठरविण्यात आले आहे. सदर न्यायनिर्णयाच्या अनुषंगाने शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.बीसीसी-२०२०/प्र.क्र.३२०/१६-ब, दिनांक ५ जुलै, २०२१ व क्र.बीसीसी-२०२१/प्र.क्र.३६०/१६-ब, दिनांक १५ जुलै, २०२१ अन्वये भरती प्रक्रिया राबविण्यासंदर्भात शासनाकडून कार्यपद्धती विहित करण्यात आली आहे. सदर शासन निर्णयातील तरतुदीनुसार सामाजिक व शैक्षणिकदृष्ट्या मागास प्रवर्गाकरीता आरक्षित पदे अराखीव पदांमध्ये रुपांतरीत करुन महाराष्ट्र दुय्यम सेवा अराजपत्रित, गट-ब (मुख्य) परीक्षा - २०१९ चा सहायक कक्ष अधिकारी पदाचा सुधारित अंतिम निकाल संबंधित उमेदवारांनी अर्जात केलेल्या दाव्यांच्या अनुषंगाने त्यांची पात्रता शासन स्तरावर मुळ प्रमाणपत्रांवरुन तपासण्याच्या अधीन राहुन दिनांक २७ ऑगस्ट, २०२१ रोजी जाहीर करण्यात आला आहे. सुधारित अंतिम निकालानुसार सदर मुख्य परीक्षेत शिफारसपात्र ठरलेल्या उमेदवारांच्या बैठक क्रमाकांसह याद्या व प्रस्तुत परीक्षेची गुणांची सीमारेषा उमेदवारांच्या माहितीसाठी आयोगाच्या www.mpsc.gov.in या संकेतस्थळावरही प्रसिध्द करण्यात आली आहे.

**२.** प्रस्तुत सुधारित अंतिम निकालानुसार नियुक्तीस शिफारसपात्र ठरलेल्या सर्व उमेदवारांच्या शिफारशी विषयांकित परीक्षेच्या आवेदनपत्रातील दाव्यांच्या पृष्ठर्थ नियुक्तीच्यावेळी त्यांची पात्रता मूळ प्रमाणपत्रावरुन तपासण्याच्या अटीच्या अधीन राहून करण्यात येत आहे. उमेदवारांनी आवेदनपत्रात दिलेली माहिती खोटी अथवा चुकीची आढळून आल्यास अथवा आवेदनपत्रातील दाव्यानुसार आवश्यक प्रमाणपत्रांची पूर्तता नियुक्तीच्यावेळी न केल्यास, अधिसूचनेतील तरतुदीनुसार दावे तपासतांना वा अन्य कारणामुळे अपात्र ठरणाऱ्या संबंधित उमेदवारांची उमेदवारी कोणत्याही टप्प्यावर रद्द करण्यात येईल.

**३.** दिव्यांगांसाठी राखीव असलेल्या पदावर शिफारस करण्यात आलेल्या उमेदवारांची प्रमाणपत्रे वैद्यकिय मंडळाकडून तपासून घेण्याच्या अधीन राहून त्यांची शासनाकडे शिफारस करण्यात येत आहे. तसेच सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय,

क्र.अपंग-१००३/प्र.क्र.१२७/ २००३/१६-अ, दिनांक ६ मे, २००४ मधील बाब क्र. (६) नुसार त्यांच्या नेमणुकीपूर्वी उमेदवार संबंधित पदावर नियुक्तीसाठी सक्षम आहे किंवा नाही याची देखील वैद्यकिय मंडळाकडून तपासणी केल्यानंतर ते नेमणुकीस पात्र ठरतील. दिव्यांगांसाठी राखीव असलेल्या पदावर शिफारस करण्यात आलेल्या उमेदवारांनी सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय, क्र.अप्रकि-२०१२/प्र.क्र.२९७/ आरोग्य-६, दिनांक ६ ऑक्टोबर, २०१२ मधील आदेशानुसार SADM या नवीन संगणक प्रणालीव्दारे वितरीत करण्यात आलेले नवीन नमुन्यातील दिव्यांगत्वाचे प्रमाणपत्र सादर करणे अनिवार्य आहे. तसेच दिव्यांग व्यक्ती हक्क अधिनियम, २०१६ च्या आधारे सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्र.दिव्यांग-२०१८/प्र.क्र.११४/१६-अ, दिनांक २९ मे, २०१९ तसेच यासंदर्भात शासनाकडून वेळोवेळी जारी करण्यात आलेल्या आदेशानुसार आरक्षणासंदर्भातील कार्यवाही करण्यात येईल.

**४.** प्रस्तुत परीक्षेचा सुधारित अंतिम निकाल समांतर आरक्षणाच्या मुद्यांसंदर्भात तसेच अन्य मुद्यांसंदर्भात विविध मा.न्यायालयात/ मा.न्यायधिकरणात दाखल न्यायिक प्रकरणातील अंतिम न्यायनिर्णयाच्या अधीन राहून जाहीर करण्यात आला आहे.

**५.** सामाजिक व शैक्षणिकदृष्टया मागास प्रवर्गाच्या ज्या उमेदवारांनी अराखीव प्रवर्गासाठी विहित करण्यात आलेली वयोमर्यादा ओलांडली असेल त्यांनी वयोमर्यादेतील सवलतीकरीता तद्अनुषंगिक प्रमाणपत्र नियुक्तीच्यावेळी सादर करणे अनिवार्य राहील.

**६.** सदर पदाच्या निकालात, गुणवत्ता यादीत तसेच शिफारस यादीत उमेदवारांचा सयुंक्त प्रश्नपत्रिका क्र.१ शी निगडित बैठक क्रमांक व प्रश्नपत्रिका क्र.२ शी निगडित बैठक क्रमांक हे दोन्ही बैठक क्रमांक नमूद करण्यात आले आहेत.

**७.** विषयांकित परीक्षेच्या गुणवत्तायादीमधील उमेदवारांची गुणवत्ता व पात्रता उमेदवारांनी अर्जात केलेले दावे विचारात घेऊन निश्चित करण्यात आली आहे. शिफारसपात्र उमेदवार वगळता अन्य उमेदवारांची गुणवत्ता व पात्रता ही अर्जातील त्यांच्या दाव्यांच्या आधारे तपासण्याच्या अधीन राहून सदर गुणवत्ता यादी आयोगाच्या संकेतस्थळावर प्रसिद्ध करण्यात आली आहे.

**८.** सदर परीक्षेमध्ये **श्री. काळे रोहीत मधुकर,** बैठक क्रमांक **MB001205** हे राज्यातून **प्रथम** आले आहेत. तसेच मागासवर्गवारीतून **श्री. मदने शुभम राजेश**, बैठक क्रमांक **MB001210** हे **प्रथम** आले आहेत व महिला वर्गवारीतून **श्रीमती अनुसे शमा गणपत,** बैठक क्रमांक **MB002196** ह्या राज्यात **प्रथम** आल्या आहेत.

उप सचिव (परीक्षा-१)
महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.